महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा मुख्य परीक्षा - २०१३ मधील सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य) या पदावरील पदस्थापनेबाबत.
श्रीम. वृंदा अमेय नायर (वृंदा वल्सन)

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांक-न्यायाप्र-२०२३/प्र.क्र.१०३/आ (संनि)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०८ एप्रिल, २०२५

## शासन निर्णय

महाराष्ट्र स्थापत्य अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा २०१३ मधील श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. ८१९/२०१७ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दि.१४.०६.२०२४ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरून श्रीमती वृंदा अमेय नायर (पूर्वाश्रमीच्या वृंदा वल्सन) यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा मुख्य परीक्षा-२०१३ मधून जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ, या पदावर दि. २१.०६.२०२४ रोजीच्या आदेशान्वये नियुक्ती देण्यात आली आहे.

२. उपरोक्त नमूद दि.२१.०६.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मेटा, नाशिक येथे सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या संवर्गात श्रीम. वृंदा नायर ह्या दिनांक २४.०६.२०२४ रोजी प्रशिक्षणासाठी रुजू झाल्या आहेत. त्यांचा प्रशिक्षण कालावधी अद्याप पूर्ण झालेला नाही. तथापि अधिक्षक अभियंता व सहसंचालक महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्या दि.०५.०२.२०२५ रोजीच्या पत्रास अनुसरून श्रीम. वृंदा नायर, सहायक अभियंता श्रेणी-१ यांचे उर्वरीत प्रशिक्षण पुढील तुकडीसोबत पुर्ण करण्यात येणार असुन पुढील तुकडी येण्यासाठी अजुन काही कालावधी लागणार आहे. तसेच श्रीम. नायर यांना दि. १३.०४.२०२५ रोजी मेटा, नाशिक या प्रबोधिनी मधून कार्यमुक्त करण्यात येणार आहे.

३. श्रीम. नायर यांना दि.१४.०४.२०२५ पासून महसूली संवर्ग वाटप नियम, २०२१ नुसार त्यांची पदस्थापना करणे आवश्यक आहे. महसूल विभाग वाटप नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार शासन निर्णय दि.२१.०६.२०२४ अन्वये मेटा, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी हजर झालेल्या श्रीम. वृंदा नायर यांना सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदासाठी महसूल विभाग वाटप व सविस्तर पदस्थापना खालीलप्रमाणे दर्शविण्यात येत असून त्यांच्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

| अ.क्र. | सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ यांचे नाव | पसंती दिलेला महसूल विभाग | सूट दिलेल्या प्रकरणी महसूल विभाग वाटप | नियमानुसार महसूल विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीम. वृंदा अमेय नायर | कोंकण-१ | - | छ.संभाजी नगर | मुख्य अभियंता (जसं) जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,परळी वैजनाथ अंतर्गत कार्यकारी अभियंता, बीड पाटबंधारे विभाग ,बीड अंतर्गत लघु पाटबंधारे उपविभाग,केज येथील रिक्त पदी. |

४. सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर महसूल विभाग वाटप झालेले उमेदवार ज्या दिवशी मेटा, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी हजर झालेले आहेत तो दिनांक त्यांचा पदस्थापनेचा दिनांक समजण्यात यावा.

५. शासन निर्णय दिनांक २१.०६.२०२४ च्या परि.७ (११) मध्ये नमूद केल्यानुसार संबंधित उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र सक्षम प्राधिकरणाकडून पडताळणी होण्याच्या अधिन राहून सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर तात्पुरती पदस्थापना देण्यात येत आहे.

६. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २१.०६.२०२४ मधील नियुक्ती संदर्भातील अन्य सर्व अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०८१७३००९०६२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2025.04.08 17:34:58 +05'30'

**(अनिल देवकाते)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. वृंदा अमेय नायर (ईमेलद्वारे)

**प्रत :-**

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग. (पत्राने)
६) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७) मा.मंत्री, जलसंपदा (गोदावरी आणि कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
८) मा.मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोंकण विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
९) महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) मुख्य अभियंता (जसं) जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१३) उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१५) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२)/आ प्रशिक्षण/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१६) संग्रहार्थ/ कार्यासन आ (संनि).